**श्री. र. र. गढरी, यांना अवर सचिव**
**पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक: असप-१२१६/प्र.क्र.७५/का.१४,**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ५ मे, २०१७.

संदर्भ : १. शासन आदेश क्र.असप १२१६/ प्र.क्र.१२/ का.१४, दि.२२.०७.२०१६.
२. सा.प्र.वि. आदेश क्रमांक कअनि-११०८/प्र.क्र.८६ /१४-ब, दि.२८.०२.२०१७

## आदेश

कक्ष अधिकारी पदावरुन अवर सचिव पदावर नियमित पदोन्नतीच्या सन २००५-२००६ च्या सुधारीत निवडसूचीवर भज-क प्रवर्गासाठी २ पदे उपलब्ध झाली होती. सदर २ पदांसाठी भज-क प्रवर्गातील श्री.म.सा.ठोंबरे व श्री.स.दि.खरात हे अधिकारी पदोन्नतीसाठी पात्र ठरले.

२. श्री. र. र. गढरी, (भज-क) हे कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठीची विभागीय परीक्षा विहित संधीत उत्तीर्ण झालेले असल्याने आता, त्यांना भज-क प्रवर्गातील सेवाकनिष्ठ श्री.स.दि.खरात, यांचा भज-क प्रवर्गातील कक्ष अधिकारी पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक १.६.२००२ हा कक्ष अधिकारी पदावरील मानीव दिनांक म्हणून संदर्भाधीन क्र.२, दि.२८.२.२०१७ च्या आदेशान्वये मंजूर करण्यात आला आहे. त्यानुषंगाने, श्री.गढरी, हे कक्ष अधिकारी संवर्गाच्या दि.०१.०१.२००५ च्या तात्पुरत्या ज्येष्ठतासूचीत श्री.खरात यांना सेवाज्येष्ठ ठरल्याने, श्री.गढरी, यांचा अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीच्या सन २००५-०६ च्या निवडसूचीसाठी विचार करण्यात आला. विभागीय पदोन्नती समितीने श्री.गढरी यांना सन २००५-०६ च्या निवडसूचीवर पात्र ठरविले असल्याने श्री.गढरी यांना दि.०१.०८.२००६ हा अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

३. श्री. र. र. गढरी हे अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीच्या सन २००५-०६ च्या निवडसूचीवर पात्र ठरले असल्यामुळे सदर निवडसूचीतील भज-क प्रवर्गातील कनिष्ठ अधिकारी श्री. स. दि. खरात यांचे नाव सन २००५-०६ च्या निवडसूचीतून याद्वारे वगळण्यात येत असून, त्यांचा समावेश पुढील निवडसूचीमध्ये करण्यात येईल. श्री.स.दि.खरात यांना संदर्भाधीन क्र.१, दि.२२.०७.२०१६ च्या आदेशान्वये सन २००५-०६ च्या निवडसूचीवर देण्यात आलेला दि.०१.०८.२००६ हा अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

४. श्री.र.र.गढरी, यांना मंजूर करण्यात आलेला सदर अवर सचिव पदावरील मानीव दिनांक मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून, तसेच मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्रमांक २९८२/२०००, २९८६/२०००, ४९५८/२००३, मधील अंतिम निकालाच्या अधीन राहतील.

५. श्री.र.र.गढरी यांना अवर सचिव पदावरील मानीव दिनांक हा सेवाज्येष्ठता व वेतननिश्चितीसाठी ग्राहय धरण्यात यावा. तसेच, श्री.गढरी यांची काल्पनिक वेतननिश्चिती अवर सचिव पदावरील मानीव दिनांक ०१.०८.२००६ या दिनांकापासून करुन, त्याचा प्रत्यक्ष लाभ त्यांना अवर सचिव पदावरील प्रत्यक्ष पदोन्नतीच्या दिनांकापासून अनुज्ञेय राहील.

६. सदरहू शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०५/१७/का.१२ दिनांक १४.०३.२०१७ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १३८/१७/सेवा-३, दिनांक ३१.३.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५०५१६४१०५५४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.05.05 16:42:36 +05'30'

**(ग. भि. गुरव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, नियोजन विभाग/कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) सह/ उप सचिव (आस्थापना), नियोजन विभाग/ कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) अवर सचिव कार्यासन १२/कार्यासन १६ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) श्री.स.दि.खरात, उप सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) श्री. र. र. गढरी, अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) कार्यासन अधिकारी(आस्थापना), नियोजन विभाग/ कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) कार्यासन अधिकारी (कार्यासन १४-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) निवडनस्ती (कार्यासन १४)